**ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी सुधारीत मार्गदर्शक <u>सूचना..</u>**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन शुद्धिपत्रक क्रमांक ग्रापाधो-११११/प्र.क्र.१७४/पापु-०७**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २ डिसेंबर, २०११**

**वाचा:-** शासन निर्णय पापुवस्ववि क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/ पापु-०७, दि.१७ मार्च, २०१०

**<u>प्रस्तावना</u> :-** संदर्भाधिन शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी सुधारीत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयातील परिच्छेद ३.१ मध्ये रु.५ कोटीपर्यंत किंमतीच्या योजनांची अंमलबजावणी ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती करील अशी तरतूद आहे.तथापि शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की राज्यातील ब-याच जिल्ह्यातील गावांमध्ये ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समित्या स्थापन करण्यावरुन वाद निर्माण होतात.त्यामुळे ग्रामिण पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी करणे प्रशासनास शक्य होत नाही.तसेच ब-याचदा ग्राम पाणी पुरवठा व समित्यांमार्फत पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी केली जात असताना मध्येच समित्यांमध्ये वाद निर्माण होऊन योजनेचे काम खोळंबून राहते.अशी परिस्थीती उद्‌भवल्यास ग्रामिण पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी कशी करावी,याबाबत सदर शासन निर्णयात स्पष्ट तरतूद नाही. त्यामुळे गावांमध्ये ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समित्या स्थापन करण्यावरुन वाद निर्माण झाला असल्यास अथवा योजनेची अंमलबजावणी सुरु असताना समित्यांमध्ये वाद निर्माण होऊन योजनेच काम रखडले असल्यास पाणी पुरवठा योजना राबविण्यास अडचण येऊ नये यासाठी पाणी पुरवठा योजना कोणी व कशी राबवावी याबाबत शुद्धिपत्रक निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन शुद्धिपत्रक:-</u>** प्रस्तावनेत नमूद केलेली माहिती विचारात घेता संदर्भाधिन शासन निर्णयातील परिच्छेद ३.१ मध्ये खालील दोन उप-परिच्छेद अंतर्भूत करण्यात येत आहे-

*तथापि गावांमध्ये ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समित्या स्थापन करण्यावरुन वाद निर्माण झाला असल्यास अथवा अस्तित्वातील पाणी पुरवठा व स्वच्छता समित्यांमध्ये वाद असल्यास अशा गावांतील ग्रामपंचायतीच्या पदाधिका-यांशी मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांनी प्रथम विचारविनिमय करुन तोडगा काढावा.विचारविनिमय व चर्चेअंती तोडगा निघत नसल्यास व त्यामुळे पाणी पुरवठा योजनांच्या कामांस विलंब होत असल्यास अशा परिस्थितीत सदर गावांच्या पाणी पुरवठा योजनांची कामे जिल्हा परिषदेमार्फत पुर्ण करण्यात यावीत. योजनेच्या अंमलबजावणीसाठी समितीस वितरीत केलेला निधी जिल्हा परिषदेने तात्काळ परत घ्यावा व योजना पुर्ण*

*करावी .समितीने निधी परत करण्यास टाळाटाळ केल्यास समितीच्या पदाधिका-यांविरुध्द पोलिसांमध्ये फोजदारी गुन्हा नोंदवावा.तसेच समितीकडून त्या निधीच्या वसूलीसाठीसूद्धा समांतर कार्यवाही करण्यात यावी. योजना राबवित असताना जिल्हा परिषदेने गावांमध्ये ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समित्या स्थापन करण्याबाबत पुढाकार घ्यावा व योजना पुर्ण झाल्यानंतर ती ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीस हस्तांतरीत करावी.*

सदर शासन शुद्धिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११२०२०८०४५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

**(र.अं.खडसे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

*प्रत,*

*मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव,*

*मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव*
*सर्व विधान सभा व विधान परिषद सदस्य*
*विभागीय आयुक्त (सर्व)*
*सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई*
*संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे*
*सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद*
*सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,*
*सर्व अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद*
*सर्व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग*
*महालेखापाल, महाराष्ट्र - १, मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)*
*महालेखापाल, महाराष्ट्र - २, नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)*
*मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई*
*उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर*
*सर्व प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा*
*सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा*
*सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती*
*नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई*
*वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,*
*ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई*
*मंत्रालयातील इतर सर्व विभाग,*
*पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने*
*निवडनस्ती, कार्यासन क्रमांक पापु-०७*